महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना
अनुदान वितरीत करण्याबाबत.
मालेगाव महानगरपालिका, जि.नाशिक

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुनिअ- २०१३/प्र.क्र.६०७/पापु.२२**
गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १४ ऑक्टोबर,२०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु२२, दिनांक २३ डिसेंबर, २००८
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ- २०१३/प्र.क्र.०१/पापु.२२ दिनांक १७.४.२०१३
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ-२०१३/प्र.क्र.६०७/पापु.२२ दिनांक २६.२.२०१४
५) आयुक्त, मालेगाव महानगरपलिका यांचे पत्र क्र.१५५/१५, दि.६.८.२०१५

**प्रस्तावना :**

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उदद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे असा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि.१७.४.२०१३ अन्वये, मालेगाव शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु.३,१६,४२,०००/- इतक्या ढोबळ किमतीच्या सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून शासन निर्णय, दि. २६.२.२०१४ अन्वये मालेगाव महानगरपालिकेस रुपये ५५ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे यांनी दिनांक ८.७.२०१३ च्या पत्रान्वये सदर योजनेच्या रु. २,९५,७२,३००/- इतक्या निव्वळ रकमेच्या सुधारणा कामास तांत्रिक मंजूरी दिली असून दि.१७.८.२०१३ च्या पत्रान्वये Flow Meter च्या कामाची एकूण निव्वळ रक्कम रु.१,८८,०९,८००/- इतक्या रकमेऐवजी रु.१,३२,५५,९७०/- इतक्या सुधारीत

किंमतीस तांत्रिक मंजूरी प्रदान केली आहे. त्यामुळे मालेगाव शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांची निव्वळ किंमत रु.२,४०,२५,४७०/- इतकी होत असून प्रशासकीय मंजूरीच्या दि. १७.४.२०१३ च्या शासन निर्णयानुसार सदर योजनेच्या निव्वळ खर्चावर ७% ई. ॲन्ड पी. चार्जेस रु. १६,८१,७८३/- लावून योजनेची मूळ किंमत रु. २,५७,०७,२५३/- इतकी होत असून मालेगाव महानगरपालिकेस रु.१,७९,९५,०७७/- इतके अनुदान अनुज्ञेय होत आहे. त्यापैकी शासन निर्णय, दि.२६.२.२०१४ अन्वये रुपये ५५ लक्ष इतके अनुदान मालेगाव महानगरपालिकेस वितरीत करण्यात आले आहे. आयुक्त, मालेगाव महानगरपालिका यांनी दि.६.८.२०१५ च्या पत्रान्वये, शासन निर्णय, दि.१७.४.२०१३ अन्वये मंजूर सुधारणा कामांपैकी ग्राहक संरक्षण, हायड्रोलिक मॉडेलिंग व जी.आय.एस. मॅपिंग करणे ही कामे ९०% पूर्ण झाली असल्याचे तसेच सुधारणा कामांपैकी फ्लो मिटर पूरवठा, उभारणी व चाचणी करणे ही कामे २५% पुर्ण झाली असल्याचे कळविले असून वितरीत अनुदानापैकी रुपये ४५.५४ लक्ष रुपयांचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत अनुदान वितरीत करताना कामाची प्रगती तपासून साधारणत: १०% रक्कम राखून ठेवून, कामे १००% पूर्ण झाल्यानंतर, वितरीत अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन राखून ठेवलेली १०% रक्कम वितरीत करण्याची तरतुद आहे. सबब, मालेगाव महानगरपालिकेस अनुज्ञेय असलेल्या अनुदानामधून १०% रक्कम रु.१७,९९,५०७/- राखून ठेवून उर्वरित अनुदान रु.१,०६,९५,५७०/-मालेगाव महानगरपालिकेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासन निर्णय दि.१७.४.२०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या मालेगाव शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांना अनुज्ञेय अनुदानापैकी रु.१,०६,९५,५७०/- (रुपये एक कोटी सहा लाख पंच्याण्णव हजार पाचशे सत्तर फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (७०%) | कर्ज (२०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून याद्वारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| मालेगाव म.न.पा. | २,५७,०७,२५३ | १,७९,९५,०७७ | ५१,४१,४५० | २५,७०,७२५ | १,००,००,००० | ५५,००,००० | **१,०६,९५,५७०** |
| | | | | | | **एकुण रुपये** | **१,०६,९५,५७०** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२)

नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ८ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१४१११११३२१९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar L Chakre

Digitally signed by Prabhakar L Chakre
DN: CN = Prabhakar L Chakre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.10.16 11:26:26 +05'30'

**(प्र.ल.चक्रे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
- प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, महसुल विभाग, नाशिक विभाग, नाशिक
- जिल्हाधिकारी, नाशिक
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे.
- संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- महापौर/आयुक्त, मालेगाव महानगरपालिका,मालेगाव, जि. नाशिक
- जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक

- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२